जलसंपदा विभागाकडील पूर्वीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सेवेस जोडून देणेबाबत...

श्री. संतोष भोलाजी रोकडे, अधीक्षक अभियंता.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग,**

**शासन आदेश क्र.संकीर्ण-१०२४/प्र.क्र.२५१/सेवा-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, चौथा मजला, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २३ मे, २०२५.

**वाचा :-**

१. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.नियुक्ती-११०७/(९९/२००७)/आ(सअश्रे-२), दि.०७.०९.२००७.
२. श्री. सं. भो. रोकडे, तत्का. सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य), जलसंपदा विभाग यांचा अर्ज, दि.३०.१०.२००७.
३. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.जीएबी-२०१०/प्र.क्र.११२/का.सेवा-२, दि.१०.०८.२०१०.
४. कार्यकारी अभियंता, गोंदिया पाटबंधारे विभाग, गोंदिया यांचे कार्यालयीन आदेश क्र.२८५३/आलि १/२०१०, दि.३१.०८.२०१०.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.सीएफएन-२०१३/१०/सेवा-२, दि.०९.१०.२०१३.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.स्थायित्व-२०२१/प्र.क्र.६४/सेवा-२, दि.२३.०६.२०२१.

**प्रस्तावना :-**

श्री. संतोष भोलाजी रोकडे, अधीक्षक अभियंता (अ.जा.) (म.लो.आ. गु.क्र.८६) यांची शासन सेवेत प्रथम नियुक्ती महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परिक्षा-२००४ (जाहिरात क्र.३७४(१) एक (१)/२००४/तीन, दि.१५.०९.२००४) मध्ये, जलसंपदा विभागाच्या संदर्भाधीन दि.०७.०९.२००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केल्यानुसार, जलसंपदा विभागात महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२ मध्ये "सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावर रु.६५००-२००-१०५०० या वेतनश्रेणीत ते हजर होतील त्या दिनांकास नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार, श्री. सं. भो. रोकडे हे सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावर दि.०४.१०.२००७ (म.पू.) रोजी हजर झाले होते.

२. श्री. सं. भो. रोकडे हे सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावर जलसंपदा विभागात गोंदिया पाटबंधारे विभाग, गोंदिया येथे कार्यरत असतांना, त्यांनी संदर्भाधीन दि.३०.१०.२००७ रोजीच्या अर्जान्वये, महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेतल्या जाणाऱ्या महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२००७ (जाहिरात क्र.३७४(१)एक(१)/२००७/तीन, दि.२४.१०.२००७) करिता अर्ज सादर करीत असल्याचे कार्यकारी अभियंता, गोंदिया पाटबंधारे विभाग, गोंदिया यांना कळविले होते.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.१०.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री. सं. भो. रोकडे, सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य), जलसंपदा विभाग यांची सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-अ मधील "सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ" या पदावर, महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून, सरळसेवेने रु.१५६००-५४००-३९१०० या वेतनश्रेणीमध्ये दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली.

४. त्यानुसार, कार्यकारी अभियंता, गोंदिया पाटबंधारे विभाग, गोंदिया यांच्या संदर्भाधीन दि.३१.०८.२०१० रोजीच्या आदेशान्वये, श्री. सं. भो. रोकडे, सहायक अभियंता, श्रेणी-२ (स्थापत्य) यांना सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ मधील सहायक कार्यकारी अभियंता, गट-अ पदावर रुजू होण्याकरिता, दि.३१.०८.२०१० (म.नं.) रोजी कार्यमुक्त करण्यात आले होते. त्यानुसार, श्री.सं. भो. रोकडे हे सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ या पदावर दि.०१.०९.२०१० (म.पू.) रोजी महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी महाविद्यालय, नाशिक येथे दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी रुजू झाले.

५. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.०९.१०.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री. सं. भो. रोकडे, सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ (अ.क्र.३) यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.०९.०९.२०१२ रोजी संपुष्टात आणून दि.१०.०९.२०१२ पासून त्यांच्या सेवा दिर्घ मुदतीसाठी पुढे चालू ठेवण्यात आल्या आहेत.

६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.२३.०६.२०२१ रोजीच्या आदेशान्वये, श्री. सं. भो. रोकडे यांना सहायक कार्यकारी अभियंता या पदावर दि.०१.०९.२०१३ पासून आवश्यक त्या सर्व प्रयोजनार्थ स्थायी शासकीय कर्मचारी म्हणून समजले जाण्यास पात्र ठरविण्यात आले आहे.

७. श्री. सं. भो. रोकडे, अधीक्षक अभियंता यांची जलसंपदा विभागाकडील सेवा ही राज्य शासनाची सेवा असून, ते पूर्वीच्या सेवेतून रितसर कार्यमुक्त झाले आहेत. तसेच, श्री. रोकडे यांच्या जलसंपदा विभागाकडील व सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सेवेत कोणताही खंड पडलेला नाही. सबब, श्री. सं. भो. रोकडे, अधीक्षक अभियंता यांची जलसंपदा विभागाकडील "सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावरील दि.०४.१०.२००७ ते दि.३१.०८.२०१० (दोन्ही दिवस धरुन) या कालावधीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील, "सहायक कार्यकारी अभियंता, गट-अ" या पदावरील दि.०१.०९.२०१० (म.पू.) पासूनच्या सेवेस जोडून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

**श्री. संतोष भोलाजी रोकडे, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांची जलसंपदा विभागाकडील पूर्वीची "सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावरील दि.०४.१०.२००७ ते दि.३१.०८.२०१० (दोन्ही दिवस धरुन) या कालावधीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील,**

**“सहायक कार्यकारी अभियंता, गट-अ” या पदावरील दि.०१.०९.२०१० (म.पू.) पासूनच्या सेवेस फक्त सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

**२.** श्री. सं. भो. रोकडे, अधीक्षक अभियंता यांच्या वेतननिश्चितीबाबत, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**३.** श्री. सं. भो. रोकडे, अधीक्षक अभियंता यांची पूर्वीची जलसंपदा विभागाकडील सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावरील रजा विद्यामान सेवेस जोडून देणेबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-२१ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

**४.** सदरचा शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.७९/सेवा-७, दि.१३.०२.२०२५, अनौपचारिक संदर्भ क्र.१२७/२५/सेवा-३, दि.१५.०४.२०२५ व अनौपचारिक संदर्भ क्र.१०४/२५/सेवा-६, दि.२९.०४.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५२३१६०००७२६१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANAGHA ABHAY JAWALE

Digitally signed by ANAGHA ABHAY JAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1b2d80236ea086889a45c2dcd2bcbeeb1963360ef86a463c0a11f7be167e68eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F265FDD947D3EB873F7094E1B871AF8C32B21F87C2B270064CF1A727E47C456D, cn=ANAGHA ABHAY JAWALE
Date: 2025.05.23 16:01:56 +05'30'

**( अनघा अभय जावळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

**श्री. संतोष भोलाजी रोकडे, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा,**
यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्यामार्फत.

प्रत :-

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, सातारा/पुणे.
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. सचिव (रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. कक्ष अधिकारी (सेवा-७ / सेवा-३ / सेवा-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी {आ.(स.अ.श्रेणी-२)}, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (आस्था-१/आस्था-२/आस्था-३/संगणक कक्ष/सेवा-२/सेवा-६), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती / सेवा-१.